**सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशिर्ष २०१० के०८८ अंतर्गत ३१-सहायक अनुदान या उद्दिष्टाखाली मंजूर व उपलब्ध अनुदानातून, विभागीय संदर्भ सेवा नाशिक व अमरावती करीता आवश्यक वैद्यकीय उपकरणे खरेदी करणे व सार्वजनिक आरोग्य विभागातंर्गत कार्यरत रुग्णालय व ट्रामाकेअर युनिटसाठी आवश्यक यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करणे या बाबीसाठी एकूण रु.३४.३३ कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः निधीवि-४८२४/प्र.क्र १५१/आरोग्य-८**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२५

<u>वाचा</u> :-

(१) सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/कार्यरत रुग्णा व ट्रामा/सुप्रमा/१२९३४/२०२४, दि.१२.०६.२०२४

(२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-१२२३/प्र.क्र.२२४/आरोग्य-८, दि. २०.०६.२०२४

(३) सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/वि.सं.से.रु./सुप्रमा/१२९१९/२०२४, दि.१२.०६.२०२४

(४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-१२२३/प्र.क्र.२५०/आरोग्य-८, दि. २०.०६.२०२४

(५) सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/लिथोट्रिप्सी मशीन/ सुप्रमा/१३०७०/२०२४, दि.१९.०६.२०२४

(६) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-१२२३/प्र.क्र.१३३/आरोग्य-८, दि. २७.०६.२०२४

(७) सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/निधी वितरण/२२१० के०८८/१३७५४/२४,दि.०८.१०.२०२४

(८) सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/खरेदी सद्यस्थिती/२२१० के०८८/१५४८७/२४,दि.२५.११.२०२४

<u>प्रस्तावना</u>:-

वाचा मधील अ.क्र. १ येथील दि.१२.०६.२०२४ रोजीच्या सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात कार्यरत रुग्णालये व ट्रामा केअर युनिट करिता प्रस्तावित करण्यात आलेल्या वैद्यकीय उपकरणाच्या खरेदीस लेखाशिर्ष २२१० के ०८८ अंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली एकूण रु.१७,०६,५३,६६०/- इतक्या रक्कमेस वाचा मधील अ.क्र. २ येथील दि.२०.०६.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

**२.** तसेच वाचा मधील अ.क्र. ३ येथील दि.१२.०६.२०२४ रोजीच्या सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक व अमरावती या रुग्णालयांसाठी खरेदी करण्यात येणाऱ्या वैद्यकीय

उपकरणांची खरेदी तसेच विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक करीता नव्याने समाविष्ट कार्डियाक कॅथलॅबसाठी एकूण रुपये २९,४०,३५,०००/- इतक्या रक्कमेस लेखाशिर्ष २२१० के ०८८ अंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली वाचा मधील अ.क्र.४ येथील दि.२०.०६.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

३. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभागाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये लेखशिर्ष २०१० के०८८ अंतर्गत ३१-सहायक अनुदान या उद्दिष्टाखाली मंजूर असलेल्या निधीमधून, विभागीय संदर्भ सेवा नाशिक व अमरावती करीता आवश्यक वैद्यकीय उपकरणे खरेदी करणे यासाठी रु.२२.८७ कोटी व सार्वजनिक आरोग्य विभागातर्गत कार्यरत रुग्णालय व ट्रामाकेअर युनिटसाठी आवश्यक यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करणे या बाबीसाठी रु.११.४६ कोटी असा एकूण रु.३४.३३ कोटी इतका निधी वितरीत करून खर्च करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार निधी वितरीत करून खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

**४. वाचा मधील अ.क्र. ७ व ८येथील अनुक्रमे दि.०८.१०.२०२४ व दि.२५.११.२०२४ रोजीच्या सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभागाने मान्यता दिल्याप्रमाणे, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये लेखशिर्ष २०१० के०८८ अंतर्गत ३१-सहायक अनुदान या उद्दिष्टाखाली मंजूर असलेल्या निधीमधून, विभागीय संदर्भसेवा नाशिक व अमरावती करीता आवश्यक वैद्यकीय उपकरणे खरेदी करणे यासाठी रु.२२.८७ कोटी व सार्वजनिक आरोग्य विभागातर्गत कार्यरत रुग्णालय व ट्रामाकेअर युनिटसाठी आवश्यक यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करणे या बाबीसाठी रु.११.४६ कोटी असा एकूण रु.३४.३३ कोटी इतका निधी वितरीत करून विहित कार्यपध्दतीने खर्च करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-**

(१) उपरोक्त योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी, सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई यांची राहील. तसेच, वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करुन कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई व आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई, यांची राहील.

(२) संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी वरीलप्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातूनच खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी, सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई , सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई तसेच आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

(३) सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ च्या परिपत्रकामधील अटींची पुर्तता झाली असल्याची खातरजमा करावी.

(४) सदर खर्च लेखाशिर्ष २२१० के ०८८, ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टातांर्गत मंजूर व उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

(५) तसेच सदर निधी ज्या बाबींसाठी उपलब्ध करून देण्यात आलेला आहे त्याच बाबीसाठी खर्च करण्यात यावा.तसेच सदर निधी खर्ची पडल्यानंतर त्याची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची

संपूर्ण जबाबदारी सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई यांची राहील.

(६) सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी. तसेच सदर निधी ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आलेला आहे त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा.

**५.** लेखाशिर्ष २२१० के ०८८, ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टातांर्गत वित्त विभागाने मान्यता दिल्याप्रमाणे निधी वितरित करण्याचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| **अ. क्र.** | **लेखाशिर्ष** | **उद्दिष्ट** | **खरेदीचा तपशील** | **वितरीत करावयाची रक्कम** |
|---|---|---|---|---|
| १ | २२१० के ०८८ | (३१) सहायक अनुदाने (वेतनेतर) | विभागीय संदर्भसेवा नाशिक व अमरावती करीता आवश्यक वैद्यकीय उपकरणे खरेदी करणे | रु.२२.८७ कोटी |
| २ | | | सार्वजनिक आरोग्य विभागातर्गत कार्यरत रुग्णालय व ट्रामाकेअर युनिटसाठी आवश्यक यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करणे | रु.११.४६ कोटी |
| **एकूण** | | | | **रु.३४.३३ कोटी** |

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद क्र. १४२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६६३/२०२४/व्यय-१३, दिनांक ०७.०१.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०२२७१७२२५६८७१७** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT,
2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2025.02.27 18:35:20 +05'30'

**(विकास तु.कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
४) सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई./पुणे
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता),मुंबई /नागपूर.
७) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.
८) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.

